**<u>तातडीचे / अर्थसंकल्पिय कामकाज प्राथम्य</u>** **महाराष्ट्र शासन**

क्रमांक : इंआयो-२०१४/प्र.क्र.३५०/योजना-१०

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,

फोर्ट, मुंबई — ४०० ००१

दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१४.

**प्रति,**

मुख्य कार्यकारी अधिकारी,

जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष,

कार्यकारी समिती,

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व

**विषय : इंदिरा आवास योजने अंतर्गत सन २०१५-१६ साठी**

**<u>वार्षिक आराखडा तयार करण्याबाबत</u>**

**महोदय / महोदया,**

सन २०१५-२०१६ साठी जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे. जिल्हा नियोजन विकास मंडळ (D. P. D. C.) कडून इंदिरा आवास योजने ( IAY) साठी आवश्यक नियतव्यय निश्चित करण्यात येतो. आवश्यक नियतव्यय मंजूर व्हावा यासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडून जिल्हा नियोजन विकास मंडळाकडे (D. P. D. C.) मागणी नोंदविणे आवश्यक आहे.

२. इंदिरा आवास योजना ही जिल्हास्तरीय केंद्र पुरस्कृत योजना आहे. सन २०१४-१५ साठी इंदिरा आवास योजने अंतर्गत राज्याकरिता १,७१,७२२ एवढया घरकूलांचे उद्दिष्ट व त्या अनुषंगाने राज्य हिस्सा व राज्य अतिरिक्त हिश्याचा नियतव्यय मंजूर झाला आहे/करण्यात येत आहे.

३. या योजनेच्या राज्याच्या उद्दिष्टामध्ये १०% एवढी वाढ पुढील आर्थिक वर्ष २०१५-१६ करिता गृहित धरून त्या अनुषंगाने सन २०१५-१६ साठी केंद्र व राज्य हिस्सा (अतिरिक्त हिस्सा व २५% राज्य हिस्सा रू.१७,५००/- वर ४% प्रशासकीय खर्चाच्या निधीसह) रू.१८६६.४२ कोटी इतक्या नियतव्ययाची मागणी नोंदविणे आवश्यक आहे. जिल्हानिहाय भौतिक व आर्थिक उद्दिष्ट (राज्य हिस्सा) सोबतच्या विवरणपत्र-"अ" व "ब"मध्ये दर्शविला आहे. तर विवरणपत्र - "क" मध्ये सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी प्रस्तावित १,८८,८९४ घरकुलांच्या उद्दिष्टासाठी केंद्र हिश्याचा प्रस्तावित नियतव्यय दर्शविला आहे.

४. स्थानिक गरजा, दारिद्रय रेषे खालील कुटूंबांच्या उपलब्ध प्रवर्गनिहाय कुटूंबाची संख्या इत्यादी बाबी विचारात घेऊन आवश्यकतेनुसार क्षेत्र निहाय बदल करण्यास जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा सक्षम आहेत. त्यामुळे सोबतच्या विवरणपत्र-"अ" व "ब" मधील जिल्हयाचे भौतिक व आर्थिक उद्दिष्ट विचारात घेऊन आवश्यकतेनुसार General, SCP, TSP, OTSP घटकांबाबत योग्य ते बदल करून त्याप्रमाणे मागणी नोंदविण्यात यावी. मात्र असा बदल करीत असतांना जिल्हयास सन २०१५-१६ या वर्षाकरिता तरतूद कमी पडणार नाही, याची कटाक्षाने दक्षता घ्यावी.

५. वरीलप्रमाणे आपल्या जिल्हयासाठी सन २०१५-२०१६ करिता इंदिरा आवास योजनेसाठी आवश्यक राज्य हिस्सा (राज्य हिस्सा (२५%)+ अतिरिक्त हिस्सा रू.२५,०००/-+ ४% प्रशासकीय खर्च (२५% राज्य हिस्सावर ४% प्रशासकीय खर्च)) नियतव्ययाची शिफारस जिल्हा नियोजन विकास मंडळाला करून निधीची तरतूद करून घेण्याची कार्यवाही करावी.

६. तसेच सन २०१५-१६ करिता आवश्यक असलेल्या केंद्र हिश्याच्या नियतव्ययाची तरतूद करण्याची विनंती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागास करण्यात येत आहे.

७. सदर पत्र व सहपत्रे महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट www.maharashtra.gov.in वर उपलब्ध केले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१४११२५१२५८२८३४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Raghunath Harishchandra Shrawanpatil

Digitally signed by Raghunath Harishchandra Shrawanpatil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Raghunath Harishchandra Shrawanpatil
Date: 2015.03.26 12:50:44 +05'30'

(र.ह.श्रावणपाटील)

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत**- वरीलप्रमाणे

**प्रत,**

१ अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२ अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३ प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४ सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५ जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
६ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा कार्यकारी अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
७ उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
८ अपर संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कक्ष (पाच प्रती)
९ प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
१० कक्ष अधिकारी का.क्र.१४४४/१४६१/१४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११ कक्ष अधिकारी, का.क्र.०६/ ०७/ १३, आदिवासी विकास विभाग मंत्रालय, मुंबई-३२
१२ कक्ष अधिकारी, का. विघयो-१, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३ कक्ष अधिकारी, योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४ निवड नस्ती योजना-१०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.